**सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य हज समितीस निधी वितरित करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०२१/प्र.क्र.६८/का-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ११ एप्रिल, २०२२

**संदर्भ**:- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः - अर्थसं-२०२२/ प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२.
२) महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई यांचे पत्र क्र.संकीर्ण-२०२२/ प्र.क्र.९/ एसएचसी/बी-५१, दि. ०४.०४.२०२२.

**प्रस्तावना**:-

महाराष्ट्र राज्य हज समितीसाठी “मागणी क्र. झेड ई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०२) समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, (०१) (१८) यात्रेकरुंचा खर्च (अनिवार्य), ३६ सहायक अनुदान (वेतन), (२२३५ ए २६७)” या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षासाठी रु. ४०.०० लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे. वित्त विभागाने “३६- सहायक अनुदाने (वेतन)” या उद्दिष्टासाठी माहे एप्रिल २०२२ मध्ये १०% निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिलेला आहे. त्यानुषंगाने महाराष्ट्र राज्य हज समितीच्या कर्मचाऱ्यांच्या माहे मार्च २०२२ च्या वेतनासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय**:-

महाराष्ट्र राज्य हज समिती कार्यालयासाठी “मागणी क्र. झेड ई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०२) समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, (०१) (१८) यात्रेकरुंचा खर्च (अनिवार्य), ३६ सहायक अनुदान (वेतन), (२२३५ ए २६७)” या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षासाठी रु. ४०.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे.

२. “३६- सहायक अनुदाने (वेतन), (२२३५ ए २६७)” या लेखाशीर्षाखाली वित्त विभागाने माहे एप्रिल २०२२ या महिन्याच्या वेतनासाठी एकूण तरतुदीच्या १० % निधी वितरीत केला आहे. त्यानुसार संदर्भ क्र. (२) येथील मागणी विचारात घेता महाराष्ट्र राज्य हज समितीच्या कर्मचाऱ्यांच्या माहे मार्च २०२२ या महिन्याच्या वेतनासाठी रु. २,७८,३४७/- (अक्षरी रुपये दोन लाख अठ्याहत्तर हजार तीनशे सत्तेचाळी फक्त) इतका निधी महाराष्ट्र राज्य हज समितीस वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर निधी यापूर्वी वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावयाच्या अटीच्या अधीन राहून कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई यांच्याकडे सुपुर्द करण्यात येत आहे. याकरिता ते “नियंत्रक अधिकारी” आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून काम पाहतील.

४. सदर निधी/तरतूद ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आली आहे. त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावी व खर्च मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेत ठेवण्यात यावा. केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र विहीत मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई यांची राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४१११७५४१५०११४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2022.04.11 17:55:59 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर, महाराष्ट्र राज्य.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३. अवर सचिव (व्यय-४/अर्थ-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अवर सचिव (का-५/का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, खोली क्र. ६ व ७, तळमजला, साबू सिद्दिकी,मुसाफिरखाना, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
६. कक्ष अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई.
७. निवडनस्ती (का-५).